राज्यातील नगरपरिषदांना जमीन महसूल आणि बिनशेतसारा अनुदान वितरीत करणेबाबत..(सन २०१४-१५)

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१६/नवि-१६**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: २० मार्च,२०१५

**संदर्भ** :-१) सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचलनालय, यांचे पत्र क्र.नपप्रसं-२०१४-१५/अर्थसंकल्पीय अंदाज/प्र.क्र.५४/का-८ दि.१७/१/२०१५
२) नगरपरिषद प्रशासन संचालनालय, यांचे परिपत्रक क्र.एलआरजी-१०८९/प्र.क्र.३७/८९/४ दिनांक १५ जून, १९८९
३) नगरविकास विभाग आणि सार्वजनिक आरोग्य विभाग परिपत्रक क्र.एमयुएन-११७५/३०१३५/एमयुएन-३ दिनांक १/८/१९७५
४) नगरविकास विभाग आणि सार्वजनिक आरोग्य विभाग परिपत्रक क्र.पीआरटी-१०८९/३०९/सी/आर/१४४/युडी-४ दिनांक ४ डिसेंबर, १९८१
५) नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांचे दिनांक ६ जुलै, २००६ चे परिपत्रक
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३ दिनांक ०२ जानेवारी २०१५

**प्रस्तावना :-**

राज्यातील नगरपरिषदांना त्यांच्या हद्दीमध्ये जमा झालेला जमीन महसूल व बिनशेत सा-यानुसार सहायक स्वरुपात अटी व शर्तीवर अनुदान देण्यासंदर्भात उक्त संदर्भाधीन क्र.५ येथे नमूद परिपत्रकानुसार सूचना निर्गमित झालेल्या आहेत.

**शासन निर्णय :-**

तद्नुषंगाने उक्त संदर्भाधीन क्र.१ येथील पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावास अनुलक्षून सन २०१४-१५ करिता वित्त विभागाने संदर्भाधीन क्र.०६ येथील शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीत तरतूदीच्या (८५%) मर्यादेत निधी वितरीत करण्यास मंजुरी दिलेली असून, त्यानुसार लेखाशीर्ष ३६०४००७६ या लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतूद रु.३,१४,०९,२००/- (रुपये तीन कोटी चौदा लक्ष नऊ हजार दोनशे फक्त) इतकी रक्कम ज्या नगरपरिषदांनी गोळा केलेला बिन शेतसारा व वृक्ष लागवडीच्या प्रमाणात अनुज्ञेय जमीन महसूल संबंधित नगरपरिषदांना त्या प्रमाणात वितरीत करण्यासाठी आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचलनालय, वरळी यांचेकडे या शासन निर्णयान्वये सुपूर्द करण्यास या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

०२. सदरील निधी आहरित करुन वितरीत करण्यासाठी सहाय्यक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व उप संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०३. याकरिता होणारा खर्च " मागणी क्रमांक-एफ-०४, ३६०४-स्थानिक, स्वराज्य संस्था व पंचायत राज्य संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, १०१, जमीन महसूल, (०१) जमीन महसूलाच्या १५ टक्के आणि बिनशेती सा-याच्या ७५ टक्के अभिहस्तांकित रकमा देण (०१)(०१) नगरपालिका(३६०४००७६) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.१३८/व्यय-३, दिनांक ०९/३/२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२७१६०८१३७२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Shashikant Narhari Yoge

Digitally signed by Shashikant Narhari Yoge
DN: CN = Shashikant Narhari Yoge, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2015.03.27 16:18:06 +05'30'

**(शशिकांत योगे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
२) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
४) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई
५) संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
६) कार्यासन व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) कार्यासन नवि-४ / संगणक कक्ष/ नवि-३१, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी,
९) निवडनस्ती (नवि-१६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.